**विभागीय परीक्षेतून देण्यात आलेली सूट रद्द करण्याबाबत.- श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य (गट-अ) महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः विभाप-३३१८/प्र. क्र.६४/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १५ जानेवारी, २०१९

वाचा:- १. शा.शि.व क्री.वि., शासन अधिसूचना क्र. एसएओ-१०११/प्र.क्र.३९/प्रशा-२, दिनांक २६.०२.२०१८
२. आयुक्त (शिक्षण) कार्यालयाचे पत्र क्र. आशिका/मलोसे/वि.परीक्षा/१८/आस्था- अ/१०५, दिनांक २१.०९.२०१८.
३. शा.शि.व क्री.वि.,शासन आदेश क्रमांकः विभाप-३३१८/प्र.क्र.६४/प्रशा-२, दिनांक ०४.१०.२०१८
४. संचालक, म.रा.शै.सं.व प्र. परिषद, पुणे यांचे क्र. मराशैसंप्रप/जिशैसाव्याविसं/वि.प./२०१८ आस्था/५४१९, दिनांक २८.१२.२०१८

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या संवर्गातील प्राचार्य (गट-अ), ज्येष्ठ अधिव्याख्याता (गट-अ) व अधिव्याख्याता (गट-ब) या पदांसाठी विभागीय परीक्षेचे विनियमन करणारे नियम २०१८, दिनांक २६.०२.२०१८ च्या अधिसूचनेन्वये प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियमातील नियम ४(१)(अ) परंतुकानुसार वयाची ५५ वर्षे पूर्ण केलेल्या अधिकाऱ्यास विभागीय परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्याची तरतूद आहे. त्यानुसार वाचा येथे अ.क्र.२ येथे नमूद दिनांक २१.०९.२०१८ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त (शिक्षण) कार्यालयाने वयाची ५५ वर्षे पूर्ण करणाऱ्या शिक्षण सक्षमीकरण शाखेतील अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेतून सूट देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावानुसार वाचा येथे नमूद दिनांक ०४.१०.२०१८ रोजीच्या शासन आदेशान्वये वयाची ५५ वर्षे पूर्ण करणाऱ्या ५ अधिकाऱ्यांना विभागीय परीक्षेतून सूट देण्यात आली आहे. त्यामध्ये परिच्छेद २ मधील कोष्टकात अ. क्र. २ येथे श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य यांच्या नावाचा समावेश आहे.

२. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी त्यांच्या वाचा येथील अ. क्र. ४ येथे नमूद पत्रान्वये आयुक्त कार्यालयाच्या प्रस्तावामध्ये श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य यांचा जन्म दिनांक २५.०८.१९६२ हा अनवधानाने नमूद करण्यात आला असून, त्यांचा जन्म दिनांक २५.०८.१९६५ असा आहे. त्यामुळे श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य यांच्या जन्मदिनांकामध्ये सदरची दुरुस्ती करुन त्यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या संवर्गातील प्राचार्य (गट-अ), ज्येष्ठ

अधिव्याख्याता (गट-अ), व अधिव्याख्याता (गट-ब) या पदांसाठी विभागीय परीक्षा नियम-२०१८ नियम ४(१)(अ) परंतुका नुसार विभागीय परीक्षेतून देण्यात आलेली सूट रद्द करण्याची विनंती केली आहे.

उक्त वस्तुस्थिती व संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांची विनंती व त्यांनी सादर केलेली कागदपत्रे पाहता, शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन आदेश :-**

श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य यांचा दिनांक २५.०८.१९६२ हा जन्म दिनांक अनावधानाने नमूद करण्यात आला असून, त्यांचा जन्म दिनांक २५.०८.१९६५ असा असल्याचे संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी त्यांच्या दिनांक २८.१२.२०१८ च्या पत्रान्वये कळविले आहे. सबब श्री. शेख कलीमोद्दीन अजीज, प्राचार्य यांच्या जन्म दिनांक २५.०८.१९६५ असा असल्यामुळे व त्यांच्या वयाची ५५ वर्षे पूर्ण होत नसल्याने शेख कलीमोद्दीन अजीज यांना महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या संवर्गातील प्राचार्य (गट-अ), ज्येष्ठ अधिव्याख्याता (गट-अ), व अधिव्याख्याता (गट-ब) या पदांसाठी विभागीय परीक्षा नियम-२०१८ नियम ४(१)(अ) परंतुका नुसार वाचा येथे अ.क्र.३ येथे नमूद दिनांक ०४.१०.२०१८ च्या शासन आदेशान्वये विभागीय परीक्षेतून देण्यात आलेली सूट या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०११५१२४०१०९२२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2019.01.16 13:11:40 +05'30'

**( र. प्र. आटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय (मध्यवर्ती इमारत), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संचालक, महाराष्ट्र राज्य संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण), पुणे
३) सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
५) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक.
३) निवडनस्ती, प्रशा-२